**राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य (Support to State Extension Reforms) या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीस सन २०११-१२ करिता प्रशासकीय मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : कृषिका१७११/प्र.क्र.१८९/३-अे,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १७ सप्टेंबर, २०११**

**संदर्भ** :- शासन निर्णय,कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
१)राविका-१७०५/प्र.क्र.३८/३ अे, दिनांक २४ ऑक्टोबर,२००५
२)केंद्र शासनाचे पत्र क्रमांक - मि.सं/एफ न२७-१८/२०११एई,दि.२५ जुलै,२०११ चे पत्र
३)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.कृआ/आत्मा/कार्यक्रम २०११-१२/विप्र-५/७३७/२०११,दि.२.९.२०११

**प्रस्तावना** :-

कृषि विस्तार कार्यक्रम पुनर्जिवित करुन शेतक-यांच्या गरजेनुरुप तसेच निकडीनुसार कृषि विस्तार कार्यक्रम राबविण्यासाठी " **राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य"** ही केंद्र पुरस्कृत योजना ९० टक्के केंद्र व १० टक्के राज्य हिस्सा या तत्वावर केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सन २००५-०६ पासून राबविण्यात येत होती. सन २०१०-११ करीता ही योजना जिल्हास्तरावर राबविण्याचे निश्चित झाले आहे. त्या अनुषंगाने प्रस्तावित निधी जिल्हाधिका-यांमार्फत संबंधित जिल्हयांना त्यांच्या आवश्यकतेनुसार उपलब्ध करण्यात येईल. केंद्रीय कृषि मंत्रालयाने राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य या योजनेचा सन २०११-१२ चा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधिन दिनांक २५ जुलै,२०११ च्या पत्रान्वये रु.५८३२.५२ लक्ष (रुपये अठावन्न कोटी बत्तीस लक्ष बावन्न हजार फक्त) च्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे.केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०११-१२ चा कार्यक्रम राबविण्यासाठी राज्याची प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

१. **"राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य"**या योजनेचा कार्यक्रम राबविण्याकरीता केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.२५ जुलै,२०११ च्या पत्रान्वये रु.५८३२.५२ लक्ष (रु.अठावन्न कोटी बत्तीस लक्ष बावन्न हजार फक्त) चा कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०११-१२ करिता मंजूर केलेल्या रु.५८३२.५२ लक्ष (रु.अठावन्न कोटी बत्तीस लक्ष बावन्न हजार फक्त) चा कार्यक्रम राबविण्यास राज्य शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त योजनेतील केंद्र हिश्याचा ९० टक्के निधी केंद्रीय कृषि मंत्रालयामार्फत **वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार प्रशिक्षण संस्था,नागपूर** या राज्याच्या शिखर प्रशिक्षण संस्थेकडे परस्पर जमा केल्यानंतर त्या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सन २०१०-११ पासून ही योजना जिल्हा योजना म्हणून राबविण्यात येणार असल्याने राज्य हिश्याचा १०% निधी संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल.

३. सन २०११-१२ मध्ये सदर योजनेची अंमलबजावणी संदर्भाधिन दिनांक २५ जुलै,२०११ च्या केंद्र शासनाच्या पत्रात नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचना,अटी व शर्तीनुसार करण्यात यावी. तसेच केंद्र शासनाने मंजूर केलेले घटक/बाबनुसार या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी संबंधिताना मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात याव्यात.या

योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी वेळोवेळी घ्यावा तसेच संबंधित जिल्हयांना जिल्हानिहाय वितरीत केलेल्या तरतुदीबाबतचा तपशील उदा.उपयोगिता प्रमाणपत्र,मासिक प्रगती अहवाल केंद्र शासनास विहित मुदतीत पाठविण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून तो महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०९१७११४६३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(वीणा राऊत )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी
कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला
कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी,जि.अहमदनगर
कुलगुरु,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,जि.रत्नागिरी
सचिव,(पदुम),कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव(मृद व जलसंधारण),ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
आयुक्त,सहकार,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,दुग्धव्यवसाय,वरळी,मुंबई,महाराष्ट्र राज्य
साखर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
संचालक (विस्तार व प्रशिक्षण),तथा नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
संचालक,पणन,सहकार विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,(समाजकल्याण),महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,रेशीम उदयोग,पुणे-मुंबई रस्ता,शासकीय दूध डेअरीसमोर,पुणे ४११००३
संचालक,सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
सर्व प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,पुणे /नागपूर /कोल्हापूर /अमरावती/औरंगाबाद/ नाशिक/खोपोली
सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
माहिती व जनसंपर्क संचालनालय (५ प्रतीसह)
नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
सर्व सहसचिव /उप सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (का.३ अे)